महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील पदस्थापनेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदस्था-२०१५ / प्र.क्र.३६०/सेवा २**
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल, दहावा मजला
मंत्रालय,मुंबई
दिनांक : २० ऑक्टोबर,२०१५

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या अधिनियम-**२००५** मधील कलम **४ (४)** (दोन) व कलम **४(५)** मधील तरतुदी तसेच सामान्य प्रशासन विभागाचे दिनांक **११.२.२०१५** रोजीचे परिपत्रकामधील तरतुदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा**,** गट अ (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ६६००) मधील जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्याची खालीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत आहे : -

| **अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना** | **बदलीचे कारण** | **बदलीने पदस्थापना** |
|---|---|---|
| डॉ. (श्रीमती) चंद्रज्योती रामदास धनगे, सहायक जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी | विनंतीनुसार | अतिरिक्त जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर (रिक्त पदी) |

२. डॉ. (श्रीमती) चंद्रज्योती रामदास धनगे यांना त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा रुजू अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई यांच्यामार्फत विहित मार्गाने शासनास सादर करण्यात यावा.

३. संबंधीत अधिकाऱ्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दि.३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सुचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची नोंद घ्यावी.

४. बदली आदेशाची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्यासाठी अधिकाऱ्यांनी त्यांच्या बदलीच्या पदावर दिलेल्या मुदतीत तात्काळ रुजू व्हावे. त्यांचे पुढील वेतन व भत्ते रुजू होणाऱ्या पदावरच काढण्यात

येतील याची संबंधीतांनी दक्षता घ्यावी अन्यथा संबंधीताना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल, याची नोंद घ्यावी.

५. संचालनालयाने जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत, त्यांचेविरुध्द वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार सदर प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashatra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. 201510201314581417 आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2015.10.20 13:44:19 +05'30'

(वि.पुं.घोडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, परभणी / लातूर
२) संचालक, आरोग्य सेवा,मुंबई
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन),मुंबई
४) उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद / लातूर मंडळ, लातूर
५) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी / लातूर
६) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता) महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी , परभणी / लातूर
९) मा.मंत्री (आरोग्य)/ मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे स्वीय सहायक
१०) मा.प्रधान सचिव(सार्वजनिक आरोग्य) यांचे स्वीय सहायक
११) संबंधीत अधिकारी (द्वारा संचालक, आरोग्य सेवा,मुंबई)